पुणे-नाशिक या नवीन रेल्वे मार्ग प्रकल्पाकरीता रु.१९६.६२ कोटी निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.आरएलवाय-११२३/प्र.क्र.१७५(भाग-१)/परिवहन-५
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-०६/०३/२०२४

वाचा:- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०२१२/१८०/प्र.क्र.३७/परिवहन-५, दिनांक १५/०४/२०२१.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०६२१/प्र.क्र.६७/परिवहन-५, दिनांक २५/१०/२०२१ व दि.१६/०३/२०२२.
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०४२२/प्र.क्र.१०९/परिवहन-५, दि.२१/०६/२०२२.
४) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-११२३/प्र.क्र.१७५/परिवहन-५, दि.२३/०२/२०२४.
५) महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (MRIDC), मुंबई यांचे दि.१६/०१/२०२४ रोजीचे पत्र.

प्रस्तावना:-

पुणे-नाशिक या नवीन दुहेरी मध्यम अतिजलद रेल्वे मार्गाचे बांधकाम करण्यासाठी राज्य शासनाचा आर्थिक सहभाग घेण्याबाबतचा निर्णय राज्य मंत्रिमंडळाने दिनांक ८ मार्च, २०२१ रोजीच्या बैठकीत घेतला आहे. सदर रेल्वे प्रकल्पाकरिता रु.१६०३९.०० कोटी खर्चाच्या अंदाजपत्रकास राज्य मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. सदर रेल्वे प्रकल्पाच्या भूसंपादन प्रयोजनासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (MRIDC), मुंबई यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.५ वरील पत्रान्वये केलेल्या विनंतीस अनुसरुन सदर रेल्वे प्रकल्पास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास महामंडळ (MRIDC), मुंबई यांना पुणे-नाशिक या नवीन दुहेरी मध्यम अतिजलद रेल्वे मार्ग प्रकल्पासाठी रु.१९६.६२ कोटी (रुपये एकशे श्यान्नव कोटी बासष्ट लक्ष फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

०२. महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास महामंडळ (MRIDC), मुंबई यांनी सदर निधी मागणीच्या प्रमाणात जिल्हाधिकारी पुणे, अहमदनगर व नाशिक यांना वितरीत करावी व याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

०३. शासनाने सह सचिव/उप सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग यांना नियंत्रण अधिकारी व अवर सचिव/कक्ष अधिकारी, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले असून या शासन निर्णयाव्दारे त्यांना सदर रक्कम प्रदान करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. यासाठी येणारा खर्च मागणी क्र.बी-७, ३००१ भारतीय रेल्वे धोरण निश्चिती, संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, ००, ८००-इतर खर्च, (००), (००) (०२)-रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग

(लेखाशीर्ष ३००१ ००५४), ३२-अंशदाने या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**०५.** महाराष्ट्र शासन, वित्त विभाग, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर देयकांन्वये आहरीत करण्यात येणा-या रक्कमेचे स्वरुप "अंशदाने" या तपशीलवार शीर्षाखाली येते. त्यानुसार तपासणी करावयाच्या सुचीत नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींचे पालन करण्यात आले आहे.

**०६.** प्रमाणित करण्यात येते की, शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ मधील परिच्छेद क्र. ४ ते १८ वरील नमूद मार्गदर्शक सुचना तसेच अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

**०७.** सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३७/२०२४/का.१४६१, दिनांक २५.०१.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११९/२०२४/व्यय-८, दिनांक ०२.०२.२०२४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०६१६०४४८७३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

MADKAR PRATAP SAMPATRAO

Digitally signed by MADKAR PRATAP SAMPATRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=691ba5cde50be5ad4d70b5410e666a3f513b4fd3934f0227b3aab4ff49ee9941, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B6C9D92AA5599BE94C2F37BF0363AAF3D243DE73A6A2F15A0AE751006929371A, cn=MADKAR PRATAP SAMPATRAO
Date: 2024.03.06 16:14:00 +05'30'

**( प्रताप माडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (MRIDC), मुंबई.
५) जिल्हाधिकारी, पुणे / अहमदनगर / नाशिक.
६) उप/सह सचिव, कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) वित्त विभाग, कार्यासन व्यय-८/बीयुडी-११, मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव/कार्यासन अधिकारी, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कम ही Maharashtra Rail Infrastructure Development Corporation Limited-MRIDC यांना धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.
१०) निवड नस्ती परिवहन-५